

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१३३) नवरत्नमालिका-१

हारनूपुरकिरीटकुण्डलविभूषितावयवशोभिनी
कारणेश्वरमौलिकोटिपरिकल्प्यमानपदपीठिकाम् ।
कालकालफणिपाशबाणधनुरङ्कुशामरुणमेखलां
फालभूतिलकलोचनां मनसि भावयामि परदेवताम् ।। १।।

नवरत्न शब्दाचा संबंध आहे नवग्रहांशी. सूर्यापासून तेजाचे ग्रहण करतात म्हणून त्यांना ग्रह म्हणतात. मग सूर्याला ग्रह का म्हणायचे? तर तो आई जगदंबे पासून तेज ग्रहण करतो.

या ग्रहांच्या तेजाने चमकतात नवरत्न.

सोप्या शब्दात जगातील समस्त चमकदार, आकर्षक अर्थात सुखदायक गोष्टींच्या मागे आहे आई जगदंबा. तिच्या दिव्य वैभवाचे हे स्तोत्र नवरत्नमालिका.

हारनूपुरकिरीटकुण्डलविभूषितावयवशोभिनीं- हार म्हणजे मोत्यांच्या माळा,नूपुर म्हणजे पैंजण,किरीट म्हणजे बाजुबंद,कुण्डल इ. अलंकारांनी विभूषित केलेल्या अवयवांनी सुशोभित दिसणाऱ्या,

कारणेश्वर- सर्व विश्वाचे कारण असणाऱ्या भगवान शंकरांच्या,

मौलिकोटि- कोट्यावधी मस्तकांना

परिकल्प्यमान

पदपीठिकाम् - जणु काही आपली पद पीठिका अर्थात पाय ठेवण्याची जागा समजणाऱ्या, प्रत्येक ब्रह्मांडाचे एक ब्रह्मदेव तसे एक शंकर. अशा अनंत कोटी ब्रह्मांडांच्या अनंत कोटी शंकरांच्या मस्तकावर पाय ठेवणारी. अर्थात यांच्यावर सत्ता चालवणाऱ्या,

कालकालफणि- कालाचाही काल असणाऱ्या फणि म्हणजे महासर्प नागराज शेषाला,

पाश म्हणजे दोरी,बाण,धनुष्य,

अंकुश इ. गोष्टी हातात धारण करणाऱ्या,

अमरुणमेखलां- लालबुंद कंबर पट्टा धारण केलेल्या,

फालभूतिलकलोचनां- मस्तकावर वेणीसाठी दोन भागात फाकवलेल्या केसांच्या मध्यभागी तिलक स्वरूपाचा तिसरा नेत्र असणाऱ्या, मनसि भावयामि परदेवताम् - परमतमा आदिशक्तीचे मी मनाने ध्यान करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१३४) नवरत्नमालिका- २

गन्धसारघनसारचारुनवनागवल्लिरसवासिनीं
सान्ध्यरागमधुराधराभरणसुन्दराननशुचिस्मिताम् ।
मन्थरायतविलोचनाममलबालचन्द्रकृतशेखरीं
इन्दिरारमणसोदरीं मनसि भावयामि परदेवताम् ।। २।।

आई जगदंबेच्या दिव्य शृंगाराचे वर्णन करताना भगवान जगद्गुरु शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात,

गन्धसार- अर्थात मलय पर्वतावर निर्माण होणारे उत्तम चंदन.

घनसार- म्हणजे कापूर,

चारुनवनागवल्लि- सुंदर कोवळ्या विड्याच्या पानांचा,

रसवासिनीं - रस धारण करणाऱ्या,

आचार्य श्री येथे बाह्य आणि अंतर्गत अशा दोन्ही शृंगारांचा विचार करीत आहेत.

चंदनाचा लेप हा बाह्य शृंगार आहे. तर विडा खाणे हा अंतर्गत शृंगार. पूर्ण भोजन झाल्यानंतर तांबूल ग्रहण हे अंतर्गत तृप्तीचे प्रतीक.

यातील कापूर दोन्हीकडे वापरला जातो. चंदना सोबत लेपा मध्ये आणि विड्या सोबत खाण्यासाठी.

अशा अंतर्बाह्य रसांना धारण करणाऱ्या, परमरसपूर्ण असणाऱ्या,

सान्ध्यराग- संध्याकाळी सूर्यास्त समयी पसरलेल्या रंगाप्रमाणे असणाऱ्या,

मधुराधराभरण- अत्यंत मधुर अर्थात आकर्षक असणाऱ्या म्हणजे ओठांचे आभूषण असणाऱ्या धारण करणाऱ्या,

सुन्दरानन- सुंदरतम मुखकमल असणाऱ्या,

शुचिस्मिताम् - अतीव पवित्र हास्य असणाऱ्या,

मन्थर- आत्मतृप्त अवस्थेत किंचित मिटलेल्या स्वरूपातील मंद, आयत- लांब,

विलोचनाम्- नेत्र असणाऱ्या

अमल- अत्यंत स्वच्छ, बालचंद्र- चंद्राची कोर,

कृतशेखरीं- मस्तकावर धारण करणाऱ्या, इन्दिरा- देवी लक्ष्मी

रमण- तिचे रमन म्हणजे भगवान श्री विष्णू.

सोदरीं - त्यांची भगिनी असणाऱ्या,

मनसि भावयामि परदेवताम् - परमदेवता आई जगदंबेचे मी मनाने ध्यान करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१३५) नवरत्नमालिका -३

स्मेरचारुमुखमण्डलां विमलगण्डलम्बिमणिमण्डलां
हारदामपरिशोभमानकुचभारभीरुतनुमध्यमाम् ।
वीरगर्वहरनूपुरां विविधकारणेशवरपीठिकां
मारवैरिसहचारिणीं मनसि भावयामि परदेवताम् ।। ३।।

आई जगदंबेच्या अतिदिव्य सौंदर्याचे आणि वैभवाचे लोकविलक्षणत्व विशद करतांना भगवान शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात, स्मेरचारुमुखमण्डलां- स्मेर शब्दाचा अर्थ आहे दंतपंक्ती किंचित दिसतील अशा प्रकारचे मंद हास्य.

अशा स्मेर हास्याने, चारू म्हणजे अत्यंत आकर्षक मुखकमलाने आई जगदंबा युक्त आहे.

अशा अत्यंतिक सुंदरतम हास्याने युक्त असणार्या, विमलगण्डलम्बिमणिमण्डलां - विमल म्हणजे अत्यंत शुद्ध, स्वच्छ, पवित्र. गंड म्हणजे गालाच्या वर आणि डोळ्यांच्या खाली असणारे, डोळे आणि कान यांच्यामधील उंचवटे.

आई जगदंबेच्या या कपोल प्रदेशावर तिच्या मणी अर्थात विविध रत्न लटकवलेल्या बटा रुळत आहेत. अशा बटांनी अधिकच आकर्षक दिसणाऱ्या, हारदामपरिशोभमान- मोत्यांच्या असंख्य माळांनी अत्यंत शोभायमान असणाऱ्या, कुचभार- समस्त विश्वाच्या भरणपोषणासाठी पर्याप्त स्वरूपात विश्व तृप्तीकारक अमृताने भरलेल्या स्तन मंडलाने,

भीरुतनुमध्यमाम् - मध्यभाग अर्थात नाजुक कंबर भंग पावेल की काय? अशी भीती असणाऱ्या, अर्थात आई जगदंबेची कंबर इतकी नाजूक आहे की हार आणि स्तनभाराने ती लचकेल की काय? अशी शंका निर्माण होते, इतकी नाजूक.

वीरगर्वहरनूपुरां- विश्वातील समस्त वीरांचा गर्व ज्या नुपुरांच्या अर्थात त्या पैंजणांनी युक्त असणारी चरणकमले नष्ट करतात अशा,

अर्थात जगातील सर्व वीर जिच्या चरणी शरण येतात अशा, विविधकारणेश्वरपीठिकां- अनेक शंकरांना आपले चरणपीठ म्हणजे पाय ठेवण्याचे साधन समजणाऱ्या,

मारवैरिसहचारिणीं- मार अर्थात कामदेव. त्याचे वैरी म्हणजे भगवान शंकर. त्यांची सहधर्मचारिणी असणाऱ्या, मनसि भावयामि परदेवताम् - परमदेवता आदिशक्तीचे मी मनाने ध्यान करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**१३६)** नवरत्नमालिका-४

भूरिभारधरकुण्डलीन्द्रमणिबद्धभूवलयपीठिकां
वारिराशिमणिमेखलावलयवह्निमण्डलशरीरिणीम् ।
वारिसारवहकुण्डलां गगनशेखरीं च परमात्मिकां
चारुचन्द्रविलोचनां मनसि भावयामि परदेवताम् ।। ४।।

आई जगदंबेच्या अतीविराट विश्वरूपाचे इथे वर्णन साकारण्यात आले आहे. विश्वातील अतीव वैभवशाली पंचमहाभूते ही जणूकाही आई जगदंबेची अवयव वा आभूषणे आहेत असे अतिभव्यतम वर्णन करतांना आचार्य श्री म्हणतात,

भूरिभारधरकुण्डलीन्द्रमणिबद्धभूवलयपीठिकां- भूरी म्हणजे प्रचंड. भार अर्थात वजन. सगळ्यात जास्त वजन कशाचे? तर या पृथ्वीचे. त्याला जो धारण करतो तो भूरीभारधर. कोण? तर कुंडलीद्र. कुंडली म्हणजे वेटोळा. वेटोळा घालून बसणारा प्राणी म्हणजे साप. त्या सर्व सापांचा इंद्र अर्थात राजा म्हणजे भगवान श्री शेषनाग.

त्याच्या मस्तकावर असणाऱ्या मण्याप्रमाणे असणारी पृथ्वी. भूवलय. ती पृथ्वी ही जिचे पदपीठ अर्थात पाय ठेवण्याचे आसन आहे अशी.

वारिराशिमणिमेखलावलय- वारी म्हणजे पाणी. ज्याची राशी म्हणजे साठा.सगळ्यात मोठी जलराशी समुद्र. तो समुद्र हीच जणू आई जगदंबेची मेखला, कंबरपट्टा आहे. कंबर पट्टा सतत हलत राहतो. तसा समुद्रही लाटांच्या स्वरूपात हलत राहतो. पण कंबर पट्टा कधी जागा सोडत नाही. तसा समुद्र आपल्या जागी स्थिर असतो. त्यामुळे त्याला कंबरपट्टा म्हटले आहे.

वह्निमण्डलशरीरिणीम् - या विश्वातील सकल वह्निमंडळ अर्थात तेजस्वी गोष्टी या आईच्या शरीर दृश्य स्वरूप आहेत. जेथे जेथे तेज आहे तेथे आईचे प्रगटीकरण आहे असा अर्थ.

वारिसारवहकुण्डलां- वारी म्हणजे पाणी. त्याचे सार म्हणजे भरलेला साठा. असा पाण्याचा साठा म्हणजे ढग वाहून नेतो तो वारा आईची कुंडले आहेत.

त्याची हालचाल तेथे गृहीत आहे.

गगनशेखरीं- गगन म्हणजे आकाश हेच जिचे शिखर म्हणजे मस्तक आहे अशी.

परमात्मिकां- परब्रह्मस्वरूपिणी.

चारुचन्द्रविलोचनां-

चंद्र आणि रवी म्हणजे सूर्य हेच जी चारू म्हणजे अत्यंत सुंदर नेत्र आहेत अशा,

मनसि भावयामि परदेवताम् - परम देवता आदिशक्तीचे मी मनाने ध्यान करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१३७) नवरत्नमालिका-५

कुण्डलत्रिविधकोणमण्डलविहारषड्दलसमुल्लस-
त्पुण्डरीकमुखभेदिनीं च प्रचण्डभानुभासमुज्ज्वलाम् ।
मण्डलेन्दुपरिवाहितामृततरङ्गिणीमरुणरूपिणीं
मण्डलान्तमणिदीपिकां मनसि भावयामि परदेवताम् ॥ ५॥

आई जगदंबेच्या परमप्रकाशित, दिव्य रूपाचे वर्णन करतांना पूज्यपाद जगद्गुरु शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात,

कुण्डलत्रिविधकोणमण्डलविहार- आई जगदंबेच्या कोणत्याही यंत्राच्या मध्यभागी असणाऱ्या त्रिकोण मंडल अर्थात स्थानामध्ये , कुंडल अर्थात आपल्याच आनंदामध्ये विहार करणारी,

षड्दलसमुल्लसत्पुण्डरीकमुखभेदिनीं - षट्दल म्हणजे सहा पाकळ्यांचे, समुल्लसद्- प्रफुल्लित, पूर्णपणे उमललेल्या, पुंडरीक अर्थात कमळ.

सहा पाकळ्यांच्या कमळाचे हे वर्णन स्वाधिष्ठान चक्राशी संबंधित आहे. हे चक्र नवनिर्मितीशी संबंधित आहे.

त्याचे मुखभेदन करणारी अर्थात कुंडलिनी स्वरूपात प्रवास करताना या चक्रातून वर जाणारी.

प्रचण्डभानुभासमुज्ज्वलाम् - सूर्याच्या तेजा प्रमाणे अत्यंत देदीप्यमान असणारी.

मण्डलेन्दुपरिवाहितामृततरङ्गिणी- चंद्र मंडलामध्ये प्रवाहित असणाऱ्या अमृत तरंगांप्रमाणे आल्हाददायक असणाऱ्या,

अरुणरूपिणीं- अरुणा प्रमाणे लालबुंद अर्थात अत्यंत आकर्षक असणाऱ्या,

मण्डलान्तमणिदीपिकां- सर्व निवासस्थानांचे अंतिम स्थान असणाऱ्या आपल्या मणिद्वीप नावाच्या लोकाला प्रकाशित करणाऱ्या,

आई जगदंबेच्या निवासस्थानाला मणिद्वीप असे म्हणतात. जसा विष्णूंचा वैकुंठ, शंकरांचा कैलास तसा आई जगदंबेचा लोक आहे मणिद्वीप. शक्तीच्या उपासकांसाठी तोच अंतीम लोक आहे. परम गंतव्यस्थान आहे.

मनसि भावयामि परदेवताम् - परमदेवता आई जगदंबेचे मी मनाने ध्यान करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१३८) नवरत्नमालिका-६

वारणाननमयूरवाहमुखदाहवारणपयोधरां
चारणादिसुरसुन्दरीचिकुरशेखरीकृतपदाम्बुजाम् ।
कारणाधिपतिपञ्चकप्रकृतिकारणप्रथममातृकां
वारणान्तमुखपारणां मनसि भावयामि परदेवताम् ।। ६।।

कोणत्याही स्त्रीचे खरे वैभव म्हणजे तिचे मातृवात्सल्य. जगज्जननी आई जगदंबेच्या त्याच मातृवात्सल्याचा आधार करीत, तिचे वर्णन करतांना आचार्यश्री म्हणतात,

वारणानन - वारण शब्दाचा एक अर्थ आहे हत्ती. त्याचे आनन म्हणजे मुख. तसे ज्यांचे मुखकमल आहेत ते भगवान गजानन.

मयूरवाह- मयूर हे ज्यांचे वाहन आहे असे. अर्थात भगवान षडानन, कार्तिकेय.

मुखदाह- त्यांचा मुखदाह अर्थात भुकेमुळे त्यांच्या मुखाची होणारी जळजळ.

वारण- येथे वारण शब्दाचा अर्थ निवारण करणे असा आहे.

पयोधरां- पयोधर शब्दाचे दोन अर्थ आहेत. वैशिष्ट्य म्हणजे येथे दोन्ही लागू पडतात.

पयोधर शब्दाचा सामान्य अर्थ आहे मेघ. पय म्हणजे पाणी त्याला धारण करणारा तो पयोधर.मुखा मधील दाह वर्णन केला असल्याने तो शांत करणारा मेघ, हा अर्थ लागू पडतो.

पय शब्दाचा दुसरा अर्थ आहे दूध. त्याला धारण करणारे मातेचे स्तन. त्या दोन्ही बालकांच्या मुखाची भुकेची आग शांत करणारे ते विश्व तृप्तीकारक पयोधर.

चारणादि- चारण म्हणजे स्तुतिपाठ करणारे गण,

सुरसुन्दरी- आई जगदंबे च्या बाबतीत हे कार्य सुर अर्थात देवतांच्या सुंदरी करत असतात. सुरसुन्दरी शब्दात एकतर ब्रह्मदेव ,विष्णू, सूर्य,इंद्र यांच्यासहधर्मचारीणी सरस्वती, लक्ष्मी, संज्ञा, इंद्राणी इ. देवपत्नी किंवा स्वर्गीय अप्सरा असे दोन्ही अर्थ आहेत.

चिकुर- मस्तकावरील केस.

शेखरीकृतपदाम्बुजाम् - ज्या चरणकमलांना मस्तकावर घेतात असे.

एकत्रित विचार करता समस्त देवनारी स्तवन करीत मस्तकावरील केसांनी जिच्या चरणकमलाची सेवा करतात अशी.

कारणाधिपतिपञ्चक- ब्रह्मदेव, विष्णू, रुद्र, ईश्वर आणि सदाशिव अशा पाच स्वरूपांना कारणधिपती पंचक असे म्हणतात.

प्रकृतिकारण- त्या सगळ्यांच्या प्रकृती म्हणजे कार्याचे कारण अर्थात अधिष्ठान स्वरूप शक्ती असणार्या,

प्रथममातृकां- आदि जननी असणाऱ्या,

वारणान्तमुखपारणां- गजमुखाच्या मुखाला आनंद देणाऱ्या,

मनसि भावयामि परदेवताम् - परम देवता आई जगदंबेचे मी मनाने ध्यान करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**१३९)** नवरत्नमालिका-७

पद्मकान्तिपदपाणिपल्लवपयोधराननसरोरुहां
पद्मरागमणिमेखलावलयनीविशोभितनितम्बिनीम् ।
पद्मसम्भवसदाशिवान्तमयपञ्चरत्नपदपीठिकां
पद्मिनीं प्रणवरूपिणीं मनसि भावयामि परदेवताम् ।। ७।।

सर्वच देवतांना प्रिय असणारे पुष्प म्हणजे कमळ. चिखलात जन्माला येऊन सूर्याच्या तेजाच्या दिशेने झेपावण्याची त्याची वृत्ती.

त्यावर गुंजारव करणार्या भ्रमरांचा शब्द, त्याचा कोमल स्पर्श, त्याचे अत्यंत आकर्षक रूप, त्यामध्ये असणाऱ्या मकरंदाचा रस आणि त्याचा नितांत मनोहारी गंध. अशा पाचही अंगाने आनंद देणारे हे पुष्प.

आई जगदंबा तशीच सर्वांगसुंदर आणि सर्वांगाने आनंद देणारी आहे. त्यामुळे तिच्या प्रत्येक अवयवाला कमळाची उपमा देताना आचार्य श्री म्हणतात,

पद्मकान्ति- कमळा प्रमाणित सौंदर्य असणारे
पद- चरणकमल, पाणि- करकमल,
पल्लव- ओष्ठकमल, पयोधर- स्तनकमल,
आननसरोरुहां- मुखकमल असणाऱ्या,
पद्मरागमणि- पद्मराग नामक रत्नाने तयार केलेली,
मेखलावलय- मेखला रुपी आवरणाने,
नीविशोभित- कमरे जवळील वस्त्र सुशोभित करण्यात आल्याने,
नितम्बिनीम् - शरीराचे समस्त विशाल अवयव सौंदर्यसंपन्न असणाऱ्या,
पद्मसम्भव- कमळातून जन्माला आलेले श्री ब्रह्मदेवांपासून
सदाशिवान्त- सदाशिवां पर्यंत,
मयपञ्चरत्नपदपीठिकां- वर वर्णन केलेल्या पंचदेवतांनी युक्त असणाऱ्या पदपीठाने अलंकृत,

तंत्र शास्त्रामध्ये आई जगदंबेच्या आसनाच्या खाली या पाच देवतांच्या मस्तकाचे वर्णन केले आहे. अशा पंचमुंडासनावर आरुढ असणाऱ्या, पद्मिनीं - हाती कमळ धारण करणाऱ्या, त्याद्वारे भक्तांना पाचही अंगाने मिळणारा परिपूर्ण आनंद प्रदान करण्याची क्षमता हाती असणाऱ्या,

प्रणवरूपिणीं - ॐकार स्वरूपिणी, परब्रह्मस्वरूपिणी.

मनसि भावयामि परदेवताम् - परम देवता असणाऱ्या आदिशक्तीचे मी मनाने ध्यान करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१४०) नवरत्नमालिका-८

आगमप्रणवपीठिकाममलवर्णमङ्गलशरीरिणीं
आगमावयवशोभिनीमखिलवेदसारकृतशेखरीम् ।
मूलमन्त्रमुखमण्डलां मुदितनादबिन्दुनवयौवनां
मातृकां त्रिपुरसुन्दरीं मनसि भावयामि परदेवताम् ।। ८।।

ॐकार. प्रणव. वैश्विक शक्तीचा आद्यतम हुंकार. सगुण निर्गुणाची जणू काही सीमारेषा.लिखाणाचा एक आकार असल्यामुळे सगुण, साकार. नादब्रह्म हे स्वरूप असल्याने निर्गुण निराकार.

आई जगदंबा अशी ओंकारस्वरूपिणी, प्रणवरूपिणी आहे. तिच्या त्याच स्वरूपाचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

आगमप्रणवपीठिकाम्- आगम अर्थात वेद, शास्त्र. तर प्रणव म्हणजे ओंकार. हेच जिचे पीठ अर्थात आसन आहे अशी. त्याच्या वर असणारी अर्थात निर्गुण निराकार.

अमलवर्ण- अत्यंत शुद्ध रंगाची. कोणत्याही स्वरूपातील मल नसणारी.

मङ्गलशरीरिणीं- अत्यंत पवित्र शरीर असणारी. सामान्य शरीर हे पंचमहाभूतांचे बनलेले असल्याने त्यात दोष असतातच. मात्र आई जगदंबेचे शरीरदेखील चैतन्याचे असल्याने ते पूर्णतः निर्दोष,पवित्र आहे.

आगमावयवशोभिनीम्- आगम अर्थात विविध शास्त्रे हीच जिचे अवयव आहेत अशी. अवयव पाहूनच माणूस कोण आहे? याचे ज्ञान होते. तसे आई जगदंबेचे ज्ञान शास्त्रानेच होते हा भाव.

अखिलवेदसारकृतशेखरीम्- सर्व वेदांचे सार मस्तकावर धारण करणारी. वेदांचे सार आहे निर्गुण निराकार ओंकार. तोच जणू आईचा मुकुट आहे.

मूलमन्त्रमुखमण्डलां- आई जगदंबेचा मूळ बीजमंत्र आहे ह्रीम् . तोच तिचे मुखमंडल आहे. अर्थात त्याच स्वरूपात तिला जाणता येते. तीच तिची ओळख आहे. मुदितनादबिन्दुनवयौवनां- अत्यंत आनंदाने उच्चार केलेला ओंकार जिचे यौवन आहे अशी. ओंकाराला अक्षरब्रह्म म्हणतात. त्यात कधीच कमतरता येत नाही. आई जगदंबेचे यौवन अर्थात सौंदर्य असेच आहे अ-क्षर आहे.

मातृकां- जगज्जननी.

त्रिपुरसुन्दरीं - त्रिपुरसुंदरी रूपात शास्त्राने वर्णन केलेल्या,

मनसि भावयामि परदेवताम् - परमदेवता आई जगदंबेचे मी मनाने ध्यान करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**१४१)** नवरत्नमालिका-९

कालिकातिमिरकुन्तलान्तघनभृङ्गमङ्गलविराजिनीं
चूलिकाशिखरमालिकावलयमल्लिकासुरभिसौरभाम् ।
बालिकामधुरगण्डमण्डलमनोहराननसरोरुहां
कालिकामखिलनायिकां मनसि भावयामि परदेवताम् ।। ९।।

कालिकां -त्या आई जगदंबेच्या परमसौंदर्याचे वर्णन करताना आचार्यश्री कालिका रूपाचे वंदन करीत आहेत. आपल्याला आश्चर्य वाटेल. आपण सौंदर्याचा संबंध गोरेपणाशी लावतो. मात्र आचार्यश्री कालिकेचे वर्णन करीत आहेत. हे शास्त्र व्यवस्थित समजून घ्यायला हवे.

काळा हा खरेतर रंगच नाही. सूर्यकिरणातील सातही रंग जेथे पूर्णपणे आकर्षून घेतल्या जातात. जेथून कोणत्याच रंगाचे परिवर्तन घडत नाही तेथे आपल्याला काळा रंग दिसतो.

या स्वरूपात एकदा आई जगदंबेच्या चरणकमलावर साधक विलीन झाला की त्याचे पुन्हा येणे होत नाही. अशा परममोक्षदायक आई जगदंबेला कालिका म्हणतात.

तिमिरकुन्तलान्तघन- अंध:कारा प्रमाणे काळ्याशार, घनदाट केस,

भृङ्गमङ्गलविराजिनीं- भुंग्यांच्या रांगाप्रमाणे शोभत असणारी,

येथे आचार्यश्री कल्पना करत आहेत की आई जगदंबेचे मुख हेच जणू कमल आहे. त्यावर असणारी काळेशार केस ही जणू भुंग्यांची रांग आहे.

चूलिकाशिखर- अत्यंत सौंदर्यपूर्ण रीतीने गुंफलेल्या वेणीच्या टोकाशी,

मालिकावलय- माळा स्वरूपात गुंफलेल्या,

मल्लिका- मोगऱ्यांच्या फुलांच्या,

सुरभिसौरभाम् - सुगंधाने मंडित असणारी.

बालिका- बालिका स्वरूप मुग्ध, निरागस.

मधुर- अत्यंत गोड, आकर्षक.

गण्डमण्डलमनोहर- कपोल प्रांताने मनोहर,

आननसरोरुहां - मुखकमल असणाऱ्या.

एखाद्या लहान बालिकेचे कपोल अर्थात गालावरील उंचवटे जसे अत्यंत सुंदर ,आकर्षक, लोभस असतात तसे आई जगदंबेचे मुखकमल आहे. हा भाव.

कालिकाम् - जगदंबा कालिका.

अखिलनायिकां- संपूर्ण ब्रह्मांडाची नायिका असणाऱ्या,

मनसि भावयामि परदेवताम्- परमदेवता आई जगदंबेचे मी मनाने ध्यान करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१४२) नवरत्नमालिका-१०

नित्यमेव नियमेन जल्पतां
भुक्तिमुक्तिफलदामभीष्टदाम् ।
शंकरेण रचितां सदा जपे-
न्नामरत्ननवरत्नमालिकाम् ।।

नऊ श्लोकात्मक नवरत्नांची ही मालिका आई जगदंबेच्या चरणी सादर करून समारोप साधताना आचार्यश्री म्हणत आहेत,

नित्यमेव - या स्तोत्राचे नित्य पठण करावे. यातील नित्य शब्द फार महत्त्वाचा आहे.

सामान्यतः माणसाची प्रवृत्ती असते की ज्यावेळी तो संकटात सापडतो त्याच वेळी त्याला भगवंताची आठवण होते. मग त्याला भक्ती सुचते. स्तोत्र आठवतात.

भगवान/ भगवती कनवाळू आहे. पण अशा अडचणीच्या वेळी रडत येणाऱ्या याचका पेक्षा नित्य स्मरण करणाऱ्या भक्ताला तेदेखील प्राधान्य देणारच ना? आपल्यालाही भगवत् कृपेची शाश्वती हवी असेल तर काही मागण्यासाठी नव्हे तर न मागता मिळालेल्या गोष्टींसाठी धन्यवाद देण्याच्या स्वरूपात स्तोत्रपठण असायला हवे. त्यासाठी ते नित्य हवे.

नियमेन- ते नियमां सकट असावे. उपासनेत नियमाला अनन्यसाधारण महत्त्व आहे.

जल्पतां- इतर वेळा जल्प शब्दाचा अर्थ काहीसा नकारात्मक आहे. ताप इ. कारणाने, मदिरा प्राशनाने बुद्धीचे नियंत्रण न उरलेला माणूस जी असंबद्ध बडबड करतो तिला जल्प असे म्हणतात. मग आचार्य श्री येथे हा शब्द का वापरतात? तर त्यातील एक भाव महत्त्वाचा आहे की तो ठरवून बोलत नाही. त्याचे बोलणे सहज असते. तसेच सहज मुख उघडले तरी आई जगदंबेचे स्तोत्रच मुखातून बाहेर यावे. अशी उदात्त भूमिका त्यामागे आहे.

भुक्ति- व्यवहारातील समस्त सुखांची साधने, त्याद्वारे मिळणारे सुख.

मुक्ति- जीवनमुक्ती

फलदाम- असे फल देणाऱ्या,

भीष्टदाम् - जे मनात येईल ते प्रदान करणारे असे हे स्तोत्र आहे.

शंकरेण रचितां - शंकराने रचलेले, आचार्य असा स्वतःच्या नावाचा उल्लेख करणार नाहीत. यात शंकराने म्हणजे भगवान शंकरांच्या कृपेने ज्याची रचना झाली आहे असे, असा भाव अपेक्षित.

सदा जपेत्

नामरत्ननवरत्नमालिकाम्- या नवरत्न मालिका नाम स्तोत्राचा सदैव जप करावा. पठण करावे.

चिंतन मनन करावे.

जय जगदंब !